राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मुलभूत/ पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित करण्याबाबत .

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक :- ग्राक्षेवि २०१५/ प्र.क्र.७७/का-९,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २२/०९/२०१५

वाचा :- १) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. अविवि -२०१०/प्र.क्र.३१ /१०/का.७, दि.१४/०५/२०१३.

२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. ग्राक्षेवि -२०१४/प्र.क्र.५१/का.७, दि. २१/०६/२०१४.

**प्रस्तावना**

राज्यातील ज्या ग्रामीण भागात अल्पसंख्याकांची लोकसंख्या लक्षणीय आहे, अशा ग्रामीण भागात मुलभूत/पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देऊन या भागात वास्तव्यास असलेल्या अल्पसंख्याक नागरिकांच्या राहणीमानाचा दर्जा उंचावण्यासाठी अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायत क्षेत्रांकरिता सन २०१३-१४ या वर्षापासून ग्रामीण क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित करण्यात आला आहे. संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयाअन्वये सदर कार्यक्रम सन २०१४-१५ वर्षात राबविण्यात आला आहे व सन २०१५-१६ वर्षापासून पुढे सुरू ठेवण्यास मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय -**

राज्यातील ज्या ग्रामपंचायतींच्या एकूण लोकसंख्येपैकी अल्पसंख्याक समूहाची (मुस्लिम, ख्रिश्चन, शीख, बौध्द, जैन व पारसी) लोकसंख्या किमान १०० किंवा त्यापेक्षा जास्त आहे, अशा अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना पुढील अनुज्ञेय पायाभूत सुविधांच्या उपलब्धतेसाठी शासनाकडून प्रति ग्रामपंचायत कमाल रु. १० लक्ष इतके अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल. अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी त्यांचे प्रस्ताव रू. १० लक्षच्या मर्यादेतच सादर करावेत. अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींचा प्रस्ताव रू. १० लक्ष मर्यादेपेक्षा अधिक रकमेचा असल्यास सदर खर्च कोणत्या योजनेतून करण्यात येणार आहे, याची माहिती देण्यात यावी.

(अ) कब्रस्तान/स्मशान/अंत्यविधीच्या जागेसाठी संरक्षक भिंत (४ फूट उंची व १ फूट रुंदी ), पाणी सुविधा, विद्युत पुरवठा व अंतर्गत ३ फूट रुंदीचा रस्ता.

(ब) सार्वजनिक सभागृह / शादीखाना हॉल,

(क) पिण्याच्या पाण्याची सुविधा/ विद्युत पुरवठा/इदगाह/सांडपाण्याची व्यवस्था / अंतर्गत रस्ते/पथदिवे/सार्वजनिक स्वच्छतागृहे.

ग्रामपंचायत क्षेत्रामध्ये इतर विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांना पूरक योजना म्हणून अल्पसंख्याक बहूल ग्रामपंचायत क्षेत्रामध्ये ही योजना सुरु राहणार आहे. त्यामुळे या

योजनेच्या अंमलबजावणीमुळे इतर विभागाच्या यासारख्याच योजनांवर कोणताही दूरगामी परिणाम होणार नाही.

**<u>योजनेच्या अंमलबजावणीची रुपरेषा व कार्यपध्दती :-</u>**

**(अ) <u>ग्रामपंचायतींचे जिल्हानिहाय संख्या निर्धारण व अनुसरावयाची कार्यपध्दती -</u>**

१. राज्यातील मुंबई शहर व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळता उर्वरित ३४ जिल्ह्यातील जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या जिल्ह्यातील अल्पसंख्याक बहूल ग्रामपंचायतींमधील अल्पसंख्याक लोकसंख्या १०० पेक्षा अधिक आहे, अशा अल्पसंख्याक बहूल ग्रामपंचायतींची सन २०११ च्या जनगणनेच्या आधारे यादी तयार करावी, सदर यादीमधील यापूर्वी अनुदान दिलेल्या ग्रामपंचायती वगळून यादीमधील अग्रस्थानी असणाऱ्या ग्रामपंचायतींचे प्रस्ताव शासनास सादर करावेत. सदर यादी माहितीस्तव शासनास सादर करावी. तसेच सदर यादी जिल्हाधिकारी व अल्पसंख्याक विकास विभाग यांच्यामार्फत त्यांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात येईल. जिल्हाधिकारी यांनी तयार केलेली यादी पुढील जनगणनेची माहिती उपलब्ध होईपर्यंत कायम राहिल.

२. अल्पसंख्याक लोकसंख्येचे संबंधित जिल्ह्याच्या एकूण ग्रामीण भागाच्या लोकसंख्येशी असलेले प्रमाण विचारात घेऊन त्या त्या जिल्ह्यांमधील योजनेचा लाभ मिळण्यासाठी पात्र ठरणाऱ्या ग्रामपंचायतींची संख्या निर्धारित करण्यात आली आहे. याबाबतचे जिल्हानिहाय विवरण या शासन निर्णयासोबतच्या **परिशिष्ट "अ"** मध्ये दर्शविण्यात आले आहे.

३. शासनामार्फत राज्यातील सर्व जिल्हाधिकारी ( मुंबई शहर व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळता ) यांना त्यांच्या जिल्ह्यातील अल्पसंख्याक बहूल ग्रामपंचायतींचे प्रस्ताव शासनाने त्यांच्या जिल्ह्यात **परिशिष्ट "अ"** मध्ये निर्धारीत केलेल्या अल्पसंख्याक बहूल ग्रामपंचायतींच्या संख्येपेक्षा अधिक तीन याप्रमाणात सादर करण्यात यावेत. या योजनेंतर्गत यादीतील अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना एकदाच अनुदान देण्यात येईल. त्यानंतर यादीतील सर्व अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना अनुदान वितरीत केल्यानंतर यादीतील सुरुवातीपासूनच्या अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना पुन्हा अनुदान उपलब्ध करुन देता येईल.

४. त्यानंतर जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या जिल्ह्यातील अल्पसंख्याक बहूल ग्रामपंचायतींचे प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्याकडून विहित कालावधीमध्ये मागविण्याची कार्यवाही करावी. अल्पसंख्याक बहूल ग्रामपंचायतींच्या प्रस्तावांची छाननी करुन शासन मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करण्यासाठी संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समिती गठीत करण्यात येत आहे.

सदर समितीची रचना पुढीलप्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | - अध्यक्ष |
| २) | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - सदस्य |
| ३) | उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - सदस्य सचिव |
| ४) | जिल्हा नियोजन अधिकारी | - सदस्य |

वरील समितीने प्रस्तावांची छाननी करून आपल्या शिफारशीसह प्रस्ताव शासनास सादर करावेत.

५. जिल्हाधिकारी यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची अंतिम छाननी शासनस्तरावर करण्यात येईल. त्यानंतर शासनाच्या मान्यतेने अल्पसंख्याक बहूल ग्रामपंचायतींना निधी वितरीत करण्यात येईल.

**(ब) <u>योजनेंतर्गत अनुदान मिळण्यासाठी संबंधित ग्रामपंचायतींनी प्रस्ताव सादर करावयाची कागदपत्रे व प्रस्ताव सादरीकरणाचे टप्पे:-</u>**

यापूर्वीच्या वर्षात प्रस्तुत योजनेचा लाभ देण्यात आला आहे, अशा अग्रस्थानावरील अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायती वगळता जिल्हास्तरीय यादीतील त्यापुढील अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना प्रस्ताव सादर करण्याबाबत **परिशिष्ट "अ"** मध्ये संख्या निर्धारित केल्यापेक्षा अधिकचे तीन प्रस्ताव सादर करण्याबाबत संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडून सूचित करण्यात येईल व त्यानुसार संबंधित ग्रामपंचायती त्यांच्या कार्यक्षेत्रातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात हाती घ्यावयाच्या विकासकामांचे सविस्तर प्रस्ताव गट विकास अधिकारी, संबंधित पंचायत समिती यांना सादर करतील. या योजनेंतर्गत ग्रामपंचायतींनी सादर करावयाच्या प्रस्तावात खालील कागदपत्रांचा समावेश असेल :-

i) गावाची/ग्रामपंचायत क्षेत्रातील एकूण लोकसंख्या व अल्पसंख्याक लोकसंख्या आणि हाती घ्यावयाच्या विकासकामासंदर्भातील "**प्रपत्र -अ**".

ii) क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत विकासकाम हाती घेण्यास ग्रामसभेने मंजूरी दिलेल्या ठरावाची प्रत.

iii) क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत हाती घ्यावयाच्या विकासकामाचे शाखा अभियंता, सार्वजनिक बांधकाम, पंचायत समिती यांनी तपासून प्रमाणित केलेले सविस्तर अंदाजपत्रक.

iv) क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत हाती घेण्यात यावयाचे विकासकाम शासनाच्या अन्य तत्सम योजनेंतर्गत हाती घेण्यात आले नसल्याबाबतचे प्रमाणपत्र.

v) यापूर्वीच्या वर्षात या योजनेंतर्गत अल्पसंख्याक बहूल ग्रामपंचायतींना निधी मंजूर व वितरीत केला असल्यास त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र प्रस्तावासोबत सादर करावेत.

vi) या योजनेंतर्गत प्रस्तावामध्ये रू. १० लक्ष मर्यादेपर्यंतची विकासकामे प्रस्तावित करावित, त्यापेक्षा अधिक रकमेच्या प्रस्ताव असल्यास अधिकचा खर्च कोणत्या योजनेतून भागविण्यात येणार आहे याबाबतची माहिती देण्यात यावी.

**(क) <u>संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत प्रस्ताव सादर करताना अनुपालन करावयाच्या अटी व शर्ती :-</u>**

i) संबंधित ग्रामपंचायत क्षेत्रात ज्या लोकवस्तीत अल्पसंख्याक समूहाच्या लोकसंख्येचे केंद्रिकरण झाले आहे, अशाच अल्पसंख्याक लोकवस्तीची निवड मुलभूत/पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्याकरिता केली जावी व रु.१०.०० लक्ष मर्यादेपर्यंत विकास कामाचा प्रस्ताव सादर करण्यात यावा.

ii) अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रात हाती घ्यावयाच्या विकास कामांचा प्रस्ताव तयार करताना संबंधित ग्रामपंचायतींनी त्या क्षेत्रातील अल्पसंख्याक समूहाच्या मुलभूत व निकडीच्या गरजा लक्षात घ्याव्यात.

iii) या योजनेतून अल्पसंख्याक समाजाचा सामूहिक लाभ होईल अशी सार्वजनिक हिताचीच कामे हाती घ्यावीत. वैयक्तिक लाभाच्या योजना हाती घेण्यात येवू नये.

**(ड) <u>अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायती यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी व अनुदानासाठी शिफारस :-</u>**

राज्यातील संबंधित गटातील अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी संबंधित पंचायत समिती कार्यालयाकडून केली जाईल. छाननी दरम्यान ज्या ग्रामपंचायतींच्या प्रस्तावामध्ये काही त्रुटी अथवा अपूर्ण कागदपत्रे असल्याचे आढळून येईल अशा ग्रामपंचायतीना त्रुटी /आवश्यक कागदपत्रे यांची १५ दिवसांच्या आत पुर्तता करण्याबाबत कळविण्यात येईल. सर्व परिपूर्ण प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर गटविकास अधिकारी, संबंधित पंचायत समिती हे सर्व पात्र ग्रामपंचायतींचे प्रस्ताव आपल्या शिफारशीसह मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद यांना सादर करतील.

संबंधित गट विकास अधिकारी यांच्याकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद यांच्याकडून पात्र ग्रामपंचायतींच्या प्रस्तावांचा तपशील संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीसमोर सादर करण्यात येईल. ही समिती योजनेसाठी पात्र ग्रामपंचायतींचा संक्षिप्त तपशील आपल्या शिफारशीसह विहित नमुन्यात (**प्रपत्र- ब**) शासनास सादर करील.तसेच प्रत्येक जिल्ह्यातील ग्रामपंचायतींची अंतिम निवड शासनामार्फत करण्यात येईल.

**<u>या योजनेंतर्गत प्रस्ताव सादर करण्याचे वेळापत्रक:-</u>**

| अ. क्र. | कालावधी | प्रस्तावाच्या सादरीकरणाचा टप्पा |
|---|---|---|
| १ | १५ ऑक्टोबर पर्यंत | अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींची यादी जिल्हाधिकारी यांनी तयार करावी व शासनाने निर्धारित केलेल्या संख्येनुसार अल्पसंख्याक बहूल ग्रामपंचायतीचे प्रस्ताव मागविण्यात यावेत. |
| २ | ३० ऑक्टोबर पर्यंत | ग्रामसेवक /ग्रामविकास अधिकारी, संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्राम पंचायत क्षेत्रासाठी आपले प्रस्ताव गट विकास अधिकारी, संबंधित पंचायत समिती यांना सादर करतील. |
| ३ | १६ नोव्हेंबर पर्यंत | गटविकास अधिकारी, संबंधित पंचायत समिती, प्रस्तावांची छाननी करून परिपूर्ण प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी , संबंधित जिल्हा परिषद यांना सादर करतील. |
| ४ | ३० नोव्हेंबर पर्यंत | जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समिती योजनेसाठी पात्र ग्रामपंचायतींचा संक्षिप्त तपशील आपल्या शिफारशीसह विहित नमुन्यात (**प्रपत्र- ब**) शासनास सादर करील. |
| ५ | ३१ डिसेंबर पर्यंत | शासनामार्फत अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींची अंतीम छाननी करण्यात येईल व अनुदानासाठी ग्रामपंचायतींची निवड करण्यात येईल. |

**<u>(इ) अनुदान वितरण :-</u>**

राज्यातील सर्व संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडून त्या त्या जिल्हयातील अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींच्या प्रस्तावांचा विहित नमुन्यातील तपशील शासनास प्राप्त झाल्यानंतर संबंधित जिल्हयातील ग्रामपंचायतींना मागणीनुसार परंतु अनुदानाच्या कमाल विहित

मर्यादेपेक्षा जास्त नाही, अशा तऱ्हेने अनुदान मंजूर केले जाईल. त्या त्या जिल्हयातील अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित जिल्हाधिकारी यांचेमार्फत मुख्य कार्यकारी अधिकारी, यांना शासनाकडून वितरित केले जाईल. तद्नंतर त्या त्या जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद अनुदानाचे वाटप संबंधित ग्रामपंचायतींना करतील.

**(फ) <u>क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे व विकासकामांची छायाचित्रे</u> :-**

जिल्हापरिषदेकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर त्या आर्थिक वर्षात संबंधित ग्रामपंचायतींनी प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्रे (**प्रपत्र-क**) आणि विकासकामांची छायाचित्रे जिल्हाधिकारी यांच्यांमार्फत अल्पसंख्यांक विकास विभागाकडे सादर करणे अनिवार्य असेल.

**(ग) <u>विकासकाम ज्या ठिकाणी हाती घेण्यात आले आहे, त्या स्थळास शासन प्रतिनिधींच्या प्रासंगिक भेटी :-</u>**

क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायत क्षेत्रात हाती घेण्यात आलेल्या अथवा पूर्ण झालेल्या विकासकामांची पाहणी करण्याकरिता शासनाचे अधिकारी प्रत्यक्ष कामाच्या स्थळास प्रासंगिक भेटी देतील व कामाच्या प्रगतीची व दर्जाची तपासणी करुन त्याबाबतचा वस्तुनिष्ठ अहवाल शासनास सादर करतील.

या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेड ई -१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२- समाजकल्याण, १९८- ग्रामपंचायतींना सहाय्य, राज्य योजनांतर्गत योजना, ०१ अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१) (०१) अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२२३५ बी ०८५)" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात येईल व त्या त्या वित्तीय वर्षात या शीर्षाखाली उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२३११२५०५२८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2015.09.23 11:31:35 +05'30'

**(अशोक गायकवाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,

५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
७. सर्व विभागीय आयुक्त,
८. सर्व जिल्हाधिकारी,
९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१५. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१६. सर्व मंत्रालयीन विभाग,
१७. सह सचिव/उप सचिव/सर्वअवर सचिव/सर्व कक्ष अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती (कार्या.९).

**शासन निर्णय क्रमांक : ग्राक्षेवि-२०१५/प्र.क्र. ७७/का.९, दि. २२/०९/२०१५ सोबतचे,**

**प्रपत्र - अ**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रांत मूलभूत / पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी क्षेत्रविकास कार्यक्रम या योजनेंतर्गत संबधित ग्रामपंचायतींनी कामांचे अंदाजपत्रक व इतर आवश्यक कागदपत्रांसह सादर करावयाची माहिती -

| | | |
|---|---|---|
| १) | या योजनेंतर्गत हाती घ्यावयाची विकासकामे (इतर विभागाच्या मान्यताप्राप्त आराखडा व सविस्तर अंदाजपत्रक यानुसार आहे/नाही ) | १) |
| | | २) |
| | | ३) |
| २) | कामाचा फायदा ग्रामपंचायत क्षेत्रातील ज्या भागांना होणार आहे त्या भागांची नावे | १) |
| | | २) |
| | | ३) |
| ३) | कामांसाठी अंदाजित खर्च | १) |
| | | २) |
| | | ३) |
| ४) | काम पूर्ण होण्यास लागणारा कालावधी | १) |
| | | २) |
| | | ३) |
| ५) | ग्रामपंचायतींची एकूण लोकसंख्या- | |
| ६) | ग्रामपंचायतीच्या एकूण लोकसंख्येपैकी अल्पसंख्यांक समाजाची लोकसंख्या व टक्केवारी - | |
| | ठिकाण :<br>दिनांक : | सही<br>ग्राम विकास अधिकारी / ग्रामसेवक,<br>संबंधित ग्रामपंचायत |

-----

**शासन निर्णय क्रमांक : ग्राक्षेवि-२०१५/प्र.क्र. ७७/का.९, दि. २२/०९/२०१५ सोबतचे,**

**प्रपत्र - ब**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मूलभूत /पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी कार्यान्वित करण्यात आलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत संबंधित ग्रामपंचायतींनी सादर केलेल्या प्रस्तावांचा संक्षिप्त तपशील-

**जिल्हा :-**

| अ. क्र | ग्रामपंचा-यतीचे नाव व तालुका | ग्रामपंचा-यतीची २०११ जनगणनेनुसार एकूण लोकसंख्या | ग्रामपंचायतीच्या २०११ जनगणनेनुसार एकूण लोकसंख्येपैकी अल्पसंख्याकांची लोकसंख्या व टक्केवारी | क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत हाती घ्यावयाचे विकासकाम / विकासकामे | विकासकाम हाती घेण्यास ग्रामसभेने मंजूरी दिलेला ठराव क्रमांक व दिनांक | क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत हाती घ्यावयाच्या विकासकामा करिता सादर करण्यात आलेल्या अंदाजपत्रकानुसार येणारा खर्च व त्यानुसार मागणी केलेला निधि | जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीची शिफारस |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | | | | | | | |
| २ | | | | | | | |
| ३ | | | | | | | |
| ४ | | | | | | | |
| ५ | | | | | | | |

-----------

**शासन निर्णय क्रमांक : ग्राक्षेवि-२०१५ /प्र.क्र. ७७ /का.९, दि. २२/०९/२०१५ सोबतचे**

**प्रपत्र-क**

**उपयोगिता प्रमाणपत्राचा नमुना**

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मुलभूत / पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. , दि. अन्वये सन २० - २० या वर्षात वितरित केलेला रु. (अक्षरी रु. ) एवढा निधि पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ | |
| ब | |
| क | |
| ड | |

२. असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधि मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)
२. मोजणी पुस्तके (Measurement Books)
३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)
४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| ग्रामविकास अधिकारी / ग्रामसेवक, संबंधित ग्रामपंचायत यांची स्वाक्षरी | मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |

-------

शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.ग्राक्षेवि-२०१५ /प्र.क्र.७७ /का -९
दि. २२/०९/२०१५ सोबतचे
परिशिष्ट-अ

| Sr. No. | Maharashtra Districts | Maharashtra Total Rural population of Minorities as per 2011 Census | Percentage of Minorities to the total Minorities population in the State (Rural) as per 2011 census | No. of Eligible GPs under the rural area dev. Scheme (Out of Total 250 GPs) |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | **Maharashtra** | **22384986** | | |
| | Maharashtra (Rural) | 7413913 | 100.00 | 250 |
| 1 | Ahmednagar | 221700 | 2.99 | 7 |
| 2 | Akola | 372557 | 5.03 | 13 |
| 3 | Amravati | 436346 | 5.89 | 15 |
| 4 | Aurangabad | 416698 | 5.62 | 14 |
| 5 | Beed | 200240 | 2.70 | 7 |
| 6 | Bhandara | 136475 | 1.84 | 5 |
| 7 | Buldhana | 517140 | 6.98 | 17 |
| 8 | Chandrapur | 208330 | 2.81 | 7 |
| 9 | Dhule | 54508 | 0.74 | 2 |
| 10 | Gadchiroli | 110867 | 1.50 | 4 |
| 11 | Gondiya | 115248 | 1.55 | 4 |
| 12 | Hingoli | 222370 | 3.00 | 7 |
| 13 | Jalgaon | 378414 | 5.10 | 13 |
| 14 | Jalna | 300191 | 4.05 | 10 |
| 15 | Kolhapur | 263833 | 3.56 | 9 |
| 16 | Latur | 240895 | 3.25 | 8 |
| 17 | Nagpur | 225226 | 3.04 | 8 |
| 18 | Nanded | 422855 | 5.70 | 14 |
| 19 | Nandurbar | 30927 | 0.42 | 1 |
| 20 | Nashik | 94113 | 1.27 | 3 |
| 21 | Osmanabad | 132287 | 1.78 | 4 |
| 22 | Palghar | 45486 | 0.61 | 2 |
| 23 | Parbhani | 213137 | 2.88 | 7 |
| 24 | Pune | 226874 | 3.06 | 8 |
| 25 | Raigad | 187352 | 2.53 | 6 |
| 26 | Ratnagiri | 221383 | 2.99 | 7 |
| 27 | Sangli | 197506 | 2.66 | 7 |
| 28 | Satara | 194424 | 2.62 | 6 |
| 29 | Sindhudurg | 52389 | 0.71 | 2 |
| 30 | Solapur | 203403 | 2.74 | 7 |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| 31 | Thane | 85561 | 1.15 | 3 |
| 32 | Wardha | 139651 | 1.88 | 5 |
| 33 | Washim | 232554 | 3.14 | 8 |
| 34 | Yavatmal | 312973 | 4.22 | 10 |

*****